निरीक्षण अधिकारी (पुरवठा)/परिमंडळ अधिकारी,
गट-ब (राजपत्रित) यांच्या बदलीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्र.: तक्रार-४३२४/प्र.क्र.१०६/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक १६ एप्रिल, २०२५.

**संदर्भ :** १) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१.
२) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-२०१४/मुस-३४/प्र.क्र.३७९/१२, दि.११.०२.२०१५.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (३), कलम ४(४) (दोन), ४(५) व कलम ६ (क) मधील तरतुदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने खालील निरीक्षण अधिकारी (पुरवठा)/परिमंडळ अधिकारी, गट-ब (राजपत्रित) यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ येथे दर्शविलेल्या पदावर व ठिकाणी बदली करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकारी यांचे नाव | सध्या कार्यरत | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. नितीन शंकरराव वाघ | परिमंडळ अधिकारी, क-परिमंडळ, अन्नधान्य वितरण कार्यालय, सोलापूर | निरीक्षण अधिकारी(पुरवठा), तह. कार्या. कवठे महांकाळ, जिल्हा -सांगली |
| २. | श्री. अनिल रामराव गवळी | परिमंडळ अधिकारी, ब-परिमंडळ, अन्नधान्य वितरण कार्यालय, सोलापूर | निरीक्षण अधिकारी(पुरवठा), तह. कार्या. महाबळेश्वर, जिल्हा- सातारा |

२. संबंधित कार्यालयाने उपरोक्तप्रमाणे बदली करण्यात येत असलेल्या अधिकारी यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या कार्यालयाकडे तात्काळ पाठवावेत.

३. सदरचे आदेश तात्काळ अंमलात येत असून बदली करण्यात येत असलेल्या अधिकारी यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी या आदेशाच्या दिनांकापासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. सदर आदेश हेच कार्यमुक्तीचे आदेश असून संबंधित कार्यालयाने नव्याने कार्यमुक्ती आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही, त्यामुळे इतर कोणत्याही आदेशाची वाट न पाहता संबंधित अधिकाऱ्याने बदलीने पदस्थापना दिलेल्या पदावर व ठिकाणी रुजू व्हावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम १५ अन्वये विहित केलेल्या तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती, त्यांचेविरुद्ध महाराष्ट्र

नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग यांनी संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या बदलीच्या पदावर रुजू करून घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास napu15.mhpds@gov.in या ई-मेल वर त्वरीत कळवावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१६१३०८१८०४०६ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
Date: 2025.04.16 13:09:20 +05'30'

**(रामचंद्र धनावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

उप आयुक्त(पुरवठा), पुणे विभाग, पुणे यांच्यामार्फत-

१) श्री. नितीन शंकरराव वाघ, परिमंडळ अधिकारी.
२) श्री. अनिल रामराव गवळी, परिमंडळ अधिकारी.

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं. ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं. वि. यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
७) जिल्हाधिकारी, सोलापूर/सांगली/सातारा.
८) उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे.
९) जिल्हा पुरवठा अधिकारी, सांगली/सातारा.
१०) अन्नधान्य वितरण कार्यालय, सोलापूर.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/सांगली/सातारा.
१२) निवडनस्ती (ना.पु. १५).